**शासकीय / अनुदानित आश्रमशाळांमध्ये कब/बुलबुल, स्काऊट/ गाईड युनिट सन २००५-०६ या वर्षापासून कायमस्वरुपी सुरु करण्यास मंजूरी देण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

शासन परिपत्रक क्रमांक शाआशा-२००५/प्र.क्र.९६/का.१३
आदिवासी विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३१ ऑक्टोबर, २००५

**संदर्भ**: आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचा प्रस्ताव क्र.शाआशा-२००५/ प्र.क्र.६:का.८ (१), दिनांक २९ जुलै, २००५

**परिपत्रक** : स्काऊट / गाईड ही आंतरराष्ट्रीय चळवळ असून जगातील चळवळीतील मुलामुलींना उत्तम संस्काराचे शिक्षण देवून आदर्श व चारित्र्यवान नागरिक तयार करण्यासाठी प्रयत्न करीत आहे. असे संस्कारक्षम शिक्षण राज्यातील मुलामुलींना देण्यासाठी महाराष्ट्र शासनाने शिक्षण, क्रिडा व समाजकल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक जीएसी/१०७२/ई, दिनांक १० फेब्रुवारी, १९७२ अन्वये सन १९७२ पासून स्काऊट गाईड अभ्यासक्रम माध्यमिक शाळांमध्ये सुरु करण्यास तसेच शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, शासन निर्णय क्रमांक एसीजी २००४/१५८/२००४/माशि-७, दिनांक ५ फेब्रुवारी, २००५ अन्वये राज्यातील सर्व प्राथमिक शाळांमध्ये कब / बुलबुल योजना राबविण्यासाठी मंजूरी दिली आहे.

२. महाराष्ट्र शासनाने सन १९७२-७३ पासून या योजनेचे कार्य, शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग क्रमांक सीजी -१०७२/८३०५/ डी, दिनांक १९ फेब्रुवारी, १९७३ अन्वये महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस् आणि गाईडस् मुंबई या संस्थेकडे सुपूर्द केले आहे.

३. शासन निर्णय क्रमांक एससीजी-१००३/(५५-२००३)/माशि-७, दिनांक १० नोव्हेंबर, २००३ अन्वये स्काऊट गाईड अभ्यासक्रम शालेय स्तरावर राबविण्यासाठी शासनाने महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस् गाईड, मुंबई या संस्थेला कायमस्वरुपी मान्यता दिली आहे.

४. वरील शासनादेशाप्रमाणे आणि महाराष्ट्र शासनाने मंजूर केलेल्या प्राथमिक व माध्यमिक स्तरावरील अभ्यासक्रमातील तरतूदीप्रमाणे, राज्यातील आदिवासी विभागांतर्गत सुरु असलेल्या काही शासकीय व अनुदानित आश्रमशाळांमध्ये अभ्यासक्रमांतील विषय योजनेप्रमाणे (Scheme of subjects) हा विषय शिकविला जातो. आदिवासी विभागांतर्गत येणाऱ्या आश्रमशाळा दुर्गम व डोंगराळ अशा आदिवासी क्षेत्रात असल्यामुळे

अभ्यासक्रमातील विषय योजनेतील वैकल्पित विषयाच्या गटातील एन.सी.सी. व आर.एस.पी. हे विषय सुरु करणे जवळजवळ अशक्य आहे. मात्र उर्वरित समाजसेवा व स्काऊटींग / गाईडींग विषयांपैकी मुलांवर किमान नीतीमूल्ये रुजविण्यासाठी, त्यांच्यावर सुसंस्कार करुन त्यांना आदर्श नागरिक बनविण्यासाठी स्काऊटींग/ गाईडींग या वैकल्पिक विषयाची निवड करणेच क्रमप्राप्त व अधिक संयुक्तिक ठरते. म्हणून सन २००५-०६ पासून आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त असलेल्या सर्व शासकीय व अनुदानित आश्रमशाळांमध्ये कब / बुलबुल व स्काऊट / गाईड अभ्यासक्रम राबविण्यात यावा असे या परिपत्रकाद्वारे कळविण्यात येत आहे. तसे सर्व शासकीय व अनुदानित प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळांना कळविण्यात यावे.

शालेय अभ्यासक्रमात कब / बुलबुल व स्काऊट / गाईड या विषयाचा समावेश करुन महाराष्ट्रात शालेयस्तरावर स्काऊटींग व गाईडींगचा अभ्यासक्रम राबविण्याची महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस् आणि गाईडस् मुंबई या संस्थेला कायम स्वरुपी मान्यता यापूर्वीच महाराष्ट्र शासनाच्या शालेय शिक्षण व क्रिडा विभागाने घेतलेल्या निर्णयाप्रमाणे देण्यात आली आहे. आदिवासी विकास विभागाच्या अंतर्गत शासकीय व अनुदानित आश्रमशाळांमध्ये खालीलप्रमाणे नमूद केलेला कार्यक्रम हाती घेण्यास याद्वारे कायमस्वरुपी मंजूरी देण्यात येत आहे. हा अभ्यासक्रम कार्यक्रम सन २००५-०६ या वर्षापासून सुरु करण्यात यावा.

(१)इयत्ता पहिली ते चौथीच्या मुलांकरिता कब व मुलींकरिता बुलबुल आणि इयत्ता पाचवी ते दहावीमधील मुलांकरिता स्काऊटींग व मुलींकरिता गाईडींगचा अभ्यासक्रम सुरु करण्यात यावा.

(२)शासकीय व अनुदानित प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळांमध्ये प्रस्तुत अभ्यासक्रम राबविण्यासाठी शिक्षक/शिक्षिकांना स्काऊट व गाईड प्रशिक्षण देण्यांत यावे.

(३) शासकीय व अनुदानित आश्रमशाळेत प्रस्तुत अभ्यासक्रम सुरु करतांना इयत्ता पहिलीपासून कब, बुलबुल व इयत्ता पाचवी पासून स्काऊट गाईडची पथके सुरु करावित. तद्नंतर दरवर्षी पुढील वर्गात कब, बुलबुल, स्काऊट व गाईडची नैसर्गिक वाढीचे वाढीव पथके सुरु करण्यात यावी.

(४) या कार्यक्रमांतर्गत खालील बाबींवरील खर्च मंजूर तरतूद / अनुदानांतून भागविण्यात यावा.

अ) प्रत्येक पथकाचे व पथकातील मुलामुलींचे वैयक्तिक नोंदणी शुल्क, युनिट नोंदणी शुल्क, शाळा सभासद शुल्क, नोंदणी अर्ज शुल्क इत्यादि

ब) युनिट सुरु करण्याचा खर्च

क) प्रशिक्षणासाठीचा खर्च

ड) शैक्षणिक साहित्य व पुस्तके यावरील खर्च

ई) शिबिरे, मेळावे व राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय जांबोरी यासाठी होणारा खर्च

वरील योजनेवरील खर्च संबंधित व्यय शीर्षाखाली चालू वित्तीय वर्षाच्या मंजूर तरतूद / अनुदानातून भागविण्यात यावा.

आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी यापुढे दरवर्षी सदरहू अभ्यासक्रम राबविण्यासाठी लागणाऱ्या खर्चाची थेट तरतूद करण्याची कार्यवाही करावी व महाराष्ट्र राज्य भारत स्काऊट व गाईड संस्थेशी तसेच राज्य संस्थेच्या अधिनस्त येणाऱ्या जिल्हा संस्थांशी संपर्क साधून या विषयाची प्रभावी अंमलबजावणी करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

मफिउल हुसेन

**(मफिऊल हुसेन)**
सह सचिव

प्रति,
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक (५ प्रती)
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे / नाशिक / नागपूर / अमरावती
राज्य मुख्य आयुक्त, महाराष्ट्र राज्य भारत स्काऊट गाईड संस्था, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लि.मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह कन्झ्युमर्स फेडरेशन लि.मुंबई
सर्व जिल्हाधिकारी
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर
महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
सर्व जिल्हा सांख्यिकी अधिकारी
सर्व शिक्षणाधिकारी, जिल्हा परिषद
सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई
मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री, शालेय शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री, शालेय शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव
सर्व कार्यासने, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती